आंतरराष्ट्रीय प्रवासी व माल वाहतूक हब-विमानतळाचा (मिहान प्रकल्प) एकात्मिक विकास प्रकल्प, नागपूर अंतर्गत प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसनासाठी महाराष्ट्र प्रकल्पबाधीत व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ मधील तरतूदीनुसार १२.५ टक्के विकसित भूखंड किंवा सानुग्रह अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक मिहान-२०१०/प्र.क्र.६४६/२८अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ७ ऑक्टोबर, २०११

वाचा १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र.एव्हीएन १००१/प्रक्र १०५/२००१/२८अ दिनांक ४ जानेवारी, २००२

२)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एव्हीएन १००४/प्र.क्र.१९/२००४/२८अ दिनांक १० मार्च, २००४

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एव्हीएन १००५/प्र.क्र.१६६/०५/२८अ दिनांक २६ जून, २००६

४) महाराष्ट्र शासन राजपत्र, भाग-१ नागपूर विभागीय पूरवणी, विभागीय आयुक्त, नागपूर यांची शासकीय अधिसूचना क्रमांक:अका-पुनर्व-सीआर-४-०५-कावि-१६०-२००९, दिनांक २६फेब्रुवारी, २००९

५) महसूल व वन विभाग, पत्र क्रमांक:बैठक ०२७१०/प्रक्र २७१/र-१ दिनांक १६ सप्टेंबर, २०१०

६) महाराष्ट्र शासन राजपत्र, भाग-१ नागपूर विभागीय पूरवणी, विभागीय आयुक्त, नागपूर यांची शासकीय अधिसूचना क्रमांक:अका-पुनर्व-सीआर-३-०१०-कावि-८२९-२०१०, दिनांक ३० सप्टेंबर, २०१०

७) महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण भाग-४, सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम, क्रमांक २८ दिनांक २४ डिसेंबर, २००९

८) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्रमांक अका/पुनर्व/मिहान प्रकल्प/सीआर-४/०५व ३/१०/कावि -१०७८/१० दिनांक १३ नोंव्हेंबर २०१०

९) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांचे पत्र क्रमांक :मविविक/मिहान/८०/२५१३ दिनांक १८ फेब्रुवारी, २०११

१०) शासन पत्र सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:मिहान २०११/प्रक्र १८९/२८अ दिनांक १७ सप्टेंबर, २०११

११) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांचेपत्र क्र.मर्वाविक/उवव्यस/१११० दिनांक २६ सप्टेंबर, २०११

१२) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांचे अ.श ा.पत्र क्र.एमएडीसी/व्हीसीएमडी/११०८ दि.२६ सप्टेंबर २०११

**प्रास्ताविक :-**

संदर्भाधीन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दिनांक ४ जानेवारी, २००२ अन्वये नागपूर येथे आंतरराष्ट्रीय प्रवासी व माल वाहतूक हब-विमानतळाचा (मिहान प्रकल्प) एकात्मिक विकास "बांधा, वापरा व हस्तांतरित करा(BOT)" तत्वावर करण्यासाठी, तसेच हब विमानतळ म्हणून सदर विमानतळाचा वापर सुकर व्हावा आणि त्यानुसार मुल्यवर्धक व आर्थिक उलाढालीचा विकास करण्याच्या दृष्टीने या प्रकल्पाचे क्षेत्र विशेष आर्थिक क्षेत्र किंवा मुक्त व्यापार क्षेत्र (SEZ/FTZ) म्हणून घोषित करण्यासाठी आणि त्याकरिता केंद्र शासनाकडे पाठपुरावा करण्याकरिता मान्यता देण्यांत आली आहे. तसेच संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १० मार्च २००४ अन्वये मिहान प्रकल्प विकसित करण्यासाठी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीची नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्यांत आली आहे.

**१.१** मिहान प्रकल्प, नागपूरकरीता अंदाजे ४३५४ हेक्टर जमीनीची आवश्यकता आहे. संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक ४ जानेवारी २००२ अन्वये अंदाजे २५५६ हेक्टर आणि शासन निर्णय, दिनांक २६ जून २००६ अन्वये ८८५.०८ हेक्टर खाजगी जमिन व १८२.४१ हेक्टर शासकीय जमिन संपादित करण्याकरिता मान्यता दिली आहे. जिल्हाधिकारी, नागपूर आणि महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांच्यामार्फत जमीन संपादनाची प्रक्रिया सुरु आहे.

**१.२.** मिहान प्रकल्पासाठी जमीन संपादनामुळे अंदाजे ३००० जमीनधारक बाधीत होत आहेत. महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम,१९९९ मधील कलम क्र.४(ब) मधील तरतुदीनुसार पाटबंधारे प्रकल्पांव्यतिरिक्त औद्योगिक वसाहतीसहीत उद्योग, अणुऊर्जा, विद्यापीठ, तेल आणि नैसर्गिक वायु, ऊर्जा, रसायन, रस्ते, राष्ट्रीय उद्यान, अभयारण्य, खाणी, इत्यादी सारख्या सर्व प्रकल्पांना उपरोक्त अधिनियम लागू होईल. तथापि संबंधित प्रकल्प प्राधिकरण किंवा निकाय यांच्यांशी करार करुन तो प्रकल्प पार पाडणे आणि प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन करणे याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र शासनाच्या संबंधित विभागाची आहे.

१.३ विधी मंडळाच्या सन २००८ च्या हिवाळी अधिवेशनात मिहान प्रकल्पबाधितांना महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ लागू करून प्रकल्पग्रस्तांना पुनर्वसनासाठी खालील ३ पर्याय उपलब्ध करण्याबाबतची घोषणा मा. मुख्यमंत्र्यांनी केली आहे-

(अ) सानुग्रह अनुदान किंवा

(ब) समकक्ष टीडीआर (TDR) किंवा

(क) १२.५ टक्के विकसित जमीन

१.४ या प्रकरणी महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) यांनी प्रस्तुत प्रकल्पासंबंधी विशेष आर्थिक क्षेत्र (SEZ) व विमानतळ हे दोन वेगवेगळे प्रकल्प समजून दोन अधिसूचना काढणे आवश्यक आहे असे अभिप्राय दिले असून, महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरणाच्या दिनांक १० ऑगस्ट, २०१० च्या बैठकीमध्ये आंतरराष्ट्रीय विमानतळ व विशेष आर्थिक क्षेत्र या दोन्हीही प्रकल्पांसाठी महाराष्ट्र प्रकल्पबाधीत व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ मधील कलम ११(१) नुसार स्वतंत्र अधिसूचना निर्गमित करण्यात याव्यात आणि पुनर्वसन योजनेचे प्रस्तावही स्वतंत्रपणे सादर करण्यात यावेत असे निर्देश देण्यात आले आहेत.

१.५ विभागीय आयुक्त, नागपूर यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ च्या कलम-११(१) आणि शासन परिपत्रक,महसूल व वन विभाग दिनांक २ जून २००४ मधील तरतुदीनुसार मिहान प्रकल्प,नागपूर अंतर्गत विशेष आर्थिक क्षेत्रातील उद्योग व संलग्न सेवा आणि आंतरराष्ट्रीय विमानतळ याकरिता दिनांक ३० सप्टेंबर २०१० रोजी शासकीय अधिसूचना निर्गमित केली आहे.

१.६ महाराष्ट्र प्रकल्पबाधीत व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ मधील कलम क्र.१७ नुसार जमीन संपादन करणारी संस्था जेव्हा प्रकल्पाच्या प्रयोजनासाठी संपादन केलेल्या जमीनीतील विकसित जमीन निकालात काढत असेल, तेव्हा शासनाने विहित केलेली रक्कम भरल्यावर प्रकल्पबाधीत व्यक्तीला, त्यांच्याकडून संपादित केलेल्या जमीनीपैकी १२.५ टक्कयाएवढी विकसित जमीन मिळण्याचा हक्क आहे.

महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२८, दिनांक २४ डिसेंबर, २००९ अन्वये महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम-१७ मध्ये दुरुस्ती करण्यात आली असून, प्रकल्पाचे स्वरुप आणि स्थानिक परिस्थिती विचारांत घेऊन, प्रकल्पग्रस्तांना विकसित जमिनीच्या ऐवजी अन्य पर्यायी लाभ देण्याच्या दृष्टीने अधिसूचना निर्गमित करण्यात आली आहे.

१.७ विभागीय आयुक्त,नागपूर आणि महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांनी अनुक्रमे संदर्भाधीन दिनांक १३ नोव्हेंबर २०१० आणि दि. १८ फेब्रुवारी, २०११ च्या पत्रान्वये नागपूर येथील विमानतळ प्रकल्प आणि विशेष आर्थिक क्षेत्र प्रकल्पांतर्गत प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसन पॅकेजसंबंधी आणि सदर पॅकेजअंतर्गत प्रकल्पग्रस्तांना १२.५ टक्के विकसित जमीन किंवा त्याऐवजी रोख मोबदला (सानुग्रह अनुदान) मंजूर करण्याबाबत सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

२. मिहान प्रकल्प, नागपूर अंतर्गत संपादित केलेली /करावयाची जमीन आंतरराष्ट्रीय विमानतळ आणि विशेष आर्थिक क्षेत्र प्रकल्पाकरीता विभागली आहे. फक्त विशेष आर्थिक क्षेत्रातील जमीन विकसित करुन निकाली काढण्यात येत असल्यामुळे महाराष्ट्र प्रकल्पबाधीत व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ मधील कलम १७ नुसार प्रकल्पग्रस्त भूधारकांना विल्हेवाट लावावयाच्या क्षेत्रातील १२.५ टक्के जमीन अनुज्ञेय होते. आंतरराष्ट्रीय विमानतळ प्रकल्पांतर्गत विकसित जमीन निकाली काढण्यात येत नसल्यामुळे सदर अधिनियमातील कलम क्र.१७ नुसार १२.५ टक्के विकसित जमीन विमानतळ प्रकल्पांतर्गत प्रकल्पग्रस्त भूधारकांना अनुज्ञेय ठरत नाही. तथापि, एक विशेष बाब म्हणून मिहान प्रकल्पांतर्गत उपरोक्त दोन प्रकल्पांतर्गत सर्व प्रकल्पग्रस्त जमीनधारकांना १२.५ टक्के विकसित जमीनीचा विकल्प किंवा १२.५ टक्के विकसित जमीनीऐवजी अनुज्ञेय रोख रक्कम /मोबदला (सानुग्रह अनुदान) चा विकल्प देता येईल. संबंधित प्रकल्पग्रस्तांना हे शासन आदेश निर्गमित झाल्यापासून एक महिन्याच्या कालावधीमध्ये या प्रकरणी लेखी विकल्प देण्याची मुभा राहील. तसेच एकदा निवड केलेल्या विकल्पामध्ये बदल करता येणार नाही.

२.१ वरीलप्रमाणे १२.५ टक्के विकसित जमीनीचे वाटप करण्यासाठी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांचेमार्फत आवश्यक जमीन उपलब्ध करुन देण्यात येईल. १२.५ टक्के विकसित जमीनीचे वाटप करण्यात यावयाच्या जमीनीपैकी किमान ३० टक्के जमीन सुविधा व सोयीसाठी कपात करण्यात येईल. तसेच १२.५ टक्के विकसित जमीनीचे वाटप करताना संबंधित प्रकल्पग्रस्तांकडून वसूल करावयाची रक्कम खालीलप्रमाणे निश्चित करण्यात यावी.

"वसूल करावयाची रक्कम = संपादन करण्यात आलेल्या जमीनीच्या (दिलेल्या लाभासह) किंमतीच्या दुप्पट रक्कम + विकास खर्च"

२.२ वरीलप्रमाणे विकसित जमीनीचे वाटप सोडतपध्दतीने (लॉटरी) करण्यात येईल.

२.३ विकसित जमीन वाटपाच्या दिनांकापासून पाच वर्षाच्या कालावधीपर्यन्त हस्तांतरीत करता येणार नाही. तथापि अशा विकसित जमीनीच्या हस्तांतरणाकरीता संबंधित प्रकल्पग्रस्त /खातेदारांनी सक्षम प्राधिकाऱ्याकडे लेखी विनंती केल्यास सदर प्रकल्पग्रस्त भूखंडधारकांकडून रु.३०० फक्त प्रति चौ.मी. हस्तांतरण शुल्क आकारुन आणि सदर रक्कमेची वसूली करुन सदर भूखंडाचे संबंधित प्रकल्पग्रस्त/खातेदारास हस्तांतरणास परवानगी देण्यात येईल.

२.४ वरीलप्रमाणे १२.५ टक्के विकसित जमीनीऐवजी जे प्रकल्पग्रस्त रोख रक्कम/मोबदल्याबाबत (सानुग्रह अनुदान) विकल्प देतील अशा प्रकल्पग्रस्तांना खालीलप्रमाणे सानुग्रह अनुदान देण्यात यावे.

" सानुग्रह अनुदान = विशेष आर्थिक क्षेत्रातील सध्याच्या जमीनीचा विक्री दर - (जमीन संपादनाच्या जमीनीची दुप्पट रक्कम + विकास खर्च ) याचे ७० टक्के "

२.५ प्रकल्पग्रस्ताने भूसंपादित जमीन /घराचा ताबा महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना दिल्यानंतरच अनुज्ञेय १२.५ टक्के विकसित जमीन किंवा अनुज्ञेय सानुग्रह अनुदान संबंधित प्रकल्पग्रस्तास देण्यात येईल.

२.६ १२.५ टक्के विकसित जमीन किंवा सानुग्रह अनुदानाबाबत प्रकल्पग्रस्तांने दिलेल्या विकल्पाविषयी मान्यता देण्याकरीता उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२.७ प्रकल्पग्रस्तांना वाटप करण्यत आलेल्या विकसित जमीन किंवा सानुग्रह अनुदानाबाबत कोणताही वाद निर्माण झाल्यास त्यासंबंधीचे प्रकरण निर्णयासाठी सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांच्याकडे सादर करण्यात यावे आणि या प्रकरणी त्यांनी दिलेला निर्णय अंतीम राहील.

३. मिहान प्रकल्प, नागपूर अंतर्गत प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसन पॅकेजकरीता अंदाजे रु.२६६ कोटी खर्च अपेक्षित असून, त्यापैकी चालू आर्थिक वर्षी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना एकूण रु.१८९,१९,९०,०००/- ( रुपये एकशे एकोणनव्वद कोटी एकोणीस लक्ष नव्वद हजार फक्त) सहायक अनुदान मंजूर करण्यासाठी शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या प्रकरणी अर्थसंकल्पीय वितरण कार्यप्रणालीनुसार निधीचे वितरण करण्यात यावे. याप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत मंजूर अंदाजपत्रकीय तरतूदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक ए-७ ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळे
१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य - राज्य योजना
(००) (०२) विमानतळाच्या विकासाकरीता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस
सहायक अनुदान (३०५३०१६४) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)

४. या प्रकरणी सहायक संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांनी वरीलप्रमाणे मंजूर केलेल्या विहित मर्यादेमध्ये आणि शासनमान्यता प्राप्त बाबींवर खर्च करण्याबाबत दक्षता घ्यावी. तसेच खर्चाचा मासिक प्रगती अहवाल शासन आणि महालेखापाल यांना सादर करावा.

५. हा शासन निर्णय महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन ) आणि वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक - ७१८/व्यय-४ दिनांक ७ ऑक्टोबर,२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१११०१११४३२४१००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ज्ञा.ल.सूळ)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रती,

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (मदत व पुनर्वसन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित,मुंबई
विभागीय आयुक्त, नागपूर
जिल्हाधिकारी, नागपूर
सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित, नागपूर
संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई
सहाय्यक संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
उप सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
निवड नस्ती, का.२८ अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई